**महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठांतर्गत सर्व घटक महाविद्यालयातील नियमित वर्ग सुरु करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक मपवि २०२१/ प्र.क्र. ६१ /माफसू**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
दिनांक - २० आक्टोबर, २०२१

<u>वाचा</u> :- १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. संकीर्ण २०२१ / प्र.क्र. ६/ विशि ३, दि. १३ ऑक्टोबर, २०२१,
२) कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांचे क्र. MAFSU/DV/ F.No.३४ /८५९/२०२१, दिनांक १८/१०/२०२१ रोजीचे पत्र.

<u>प्रस्तावना :-</u>

राज्यातील ग्रामीण भागातील इयत्ता ५ वी ते १२ वी व शहरी भागात इयत्ता ८ वी ते १२ वी चे वर्ग दिनांक ०४ ऑक्टोबर, २०२१ पासून सुरु करण्यात आले आहेत. तसेच उच्च व तंत्र शिक्षण विभागने शासन परिपत्रक दिनांक १३/१०/२०२१ अन्वये राज्यातील सर्व अकृषि विद्यापीठे, अभिमत विद्यापीठे, स्वयंअर्थसहाय्यीत विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न महाविद्यालयातील नियमित वर्ग दिनांक २०/१०/२०२१ पासून सुरु करण्यास मान्यता दिलेली आहे. सदर वर्ग सुरु करतांना कोव्हिड-१९ च्या व्यवस्थापनाबाबतचे राष्ट्रीय निदेश, कामांच्या ठिकाणांबाबतचे अतिरिक्त निर्देश, राज्य शासनाने वेळोवेळी काढलेली मार्गदर्शक तत्वे किंवा मानक कार्य प्रणाली (एसओपी) तसेच विद्यापीठ अनुदान आयोगाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचनेच्या अनुषंगाने सर्व अकृषि विद्यापीठे व त्याच्याशी संलग्नीत महाविद्यालये सुरु करण्यास मान्यता दिलेली आहे. त्याच धर्तीवर महाराष्ट्र पशु व मत्स्य विद्यापीठांतर्गत सर्व घटक महाविद्यालयातील नियमित वर्ग सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन परिपत्रक :-

(१) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठांतर्गत असलेली विविध घटक महाविद्यालयामधील प्रत्यक्षपणे नियमित वर्ग **दिनांक २० ऑक्टोबर, २०२१** पासून सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तथापि, विद्यापीठांतर्गत असलेल्या घटक महाविद्यालयांचे वर्ग ५० टक्के किंवा त्यापेक्षा जास्त क्षमतेने सुरु करण्याबाबत स्थानिक प्राधिकरणांशी विचारविनियम करुन विद्यापीठांनी त्यांचे स्तरावर निर्णय घ्यावा.

(२) १८ वर्षावरील विद्यार्थी ज्यांनी कोव्हिड-१९ च्या लसीचे दोन्ही डोस घेतलेले व तद्नंतर १४ दिवस पूर्ण झालेले आहेत, तेच विद्यार्थी महाविद्यालयात प्रत्यक्ष उपस्थित राहू शकतील.

(३) प्रतिबंधित प्रक्षेत्रात येणारे विद्यापीठ व घटक महाविद्यालये ही ज्या आयुक्त, महानगरपालिका/ नगरपालिका किंवा जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांचे अंतर्गत येतात, त्यांच्याशी कोव्हिड १९ च्या आजाराचा स्थानिक पातळीवरील प्रादुर्भाव व स्थानिक परिस्थिती, प्रतिबंधित प्रक्षेत्रांचे नियोजन व आरोग्यविषयक पायाभूत सुविधांची उपलब्धता या बाबी विचारात घेऊन, विद्यापीठ व महाविद्यालये सुरु करण्याबाबत विचारविनियम करुन योग्य तो निर्णय विद्यापीठाने त्यांच्या स्तरावर घ्यावा व त्यानुसार महाविद्यालयांना सविस्तर मार्गदर्शक सूचना/मानक कार्य प्रणाली (एसओपी) देण्यात यावी.

(४) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाच्या घटक महाविद्यालयांना कोव्हिड-१९ च्या व्यवस्थापनाबाबतचे राष्ट्रीय निदेश, कामांच्या ठिकाणांबाबतचे अतिरिक्त निदेश, राज्य शासनाने वेळोवेळी काढलेली मार्गदर्शक तत्वे किंवा मानक कार्य प्रणाली (एसओपी) तसेच विद्यापीठ अनुदान आयोगाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना लागू राहतील.

(५) ज्या विद्यार्थी/ विद्यार्थीनींना प्रत्यक्ष महाविद्यालयात उपस्थित राहता येणार नाही, त्यांना ऑनलाईन सुविधा उपलब्ध करुन देण्यात यावी.

(६) महाविद्यालये व वस्तीगृहे सुरु करण्याकरीता विद्यापीठाने कोव्हिड १९ च्या आजाराचा स्थानिक पातळीवरील प्रादुर्भाव व स्थानिक परिस्थिती विचारात घेवून सविस्तर मार्गदर्शक तत्वे किंवा मानक कार्य प्रणाली (एसओपी) तयार करुन स्वतंत्रपणे निर्गमित करावी.

(७) ज्या विद्यार्थी/ विद्यार्थीनींनी कोव्हिड १९ ची लस घेतलेली नाही, त्यांच्याकरीता विद्यापीठाने संबंधित संस्थांचे प्रमुख/महाविद्यालयांचे सहयोगी अधिष्ठाता यांचे मदतीने स्थानिक जिल्हा प्रशासनाशी समन्वय साधून लसीकरणासाठी विशेष मोहिम राबवून लसीकरण प्राध्यान्याने पूर्ण करुन घ्यावे. तसेच विद्यापीठ/ महाविद्यालयातील व्यवस्थापन, शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे देखील लसीकरण प्राधान्याने करुन घ्यावे.

(८) कोव्हिड-१९ विषयक प्रादुर्भाव रोखण्याकरीता राज्य शासन, केंद्र शासन व स्थानिक प्रशासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याची संपूर्ण जबाबदारी विद्यापीठाची आणि संबंधीत महाविद्यालयाची राहील.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashta.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्यांचा संगणक संकेतांक २०२११०२०१६४६२३२६०१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Dilip JAIRAM Shedmekhe

Digitally signed by Dilip JAIRAM Shedmekhe
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5c22eb48b36977859e2ada92f034598cc0bc8511f0527da968636a6b9d9e10f0, pseudonym=98E168C137D7D21555448E4EC99B0801FF1E3C04, serialNumber=5603A72FFDB1EF7B928B7C0A641BD1C8EF4B36AA6A8FD21A86271888A24F9803, cn=Dilip JAIRAM Shedmekhe
Date: 2021.10.20 16:49:30 +05'30'

**( दि. ज.शेडमेखे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, तेलंगखेडी, फुटाळा तलाव, नागपूर-१
८. आयुक्त पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य, पुणे - १.
९. संबंधित महानगरपालिका आयुक्त/ जिल्हाधिकारी
१०. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, तेलंगखेडी, फुटाळा तलाव, नागपूर-१.
११. सर्व सहयोगी अधिष्ठाता, पशुवैद्यकीय/दुग्धतंत्रज्ञान/ मत्स्य विज्ञान महाविद्यालय
१२. निवड नस्ती.